**अस्तित्वातील पुणे शिरूर अहमदनगर मार्गे छत्रपती संभाजीनगर या राष्ट्रीय महामार्गाच्या At grade रस्त्याची (NH-७५३F) सुधारणा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२४/प्र.क्र.८८(भाग-३)/नियो-१अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २५ एप्रिल,२०२५.

**वाचा**:- १. शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२४/प्र.क्र.८८(भाग-३)/नियो-१अ, दि. १९.०९.२०२४
२. शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२४/प्र.क्र.८८(भाग-१)/नियो-१अ, दि. ०१.१०.२०२४

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मार्फत अस्तित्वातील पुणे शिरूर अहमदनगर मार्गे छत्रपती संभाजीनगर या राष्ट्रीय महामार्गाची (NH-७५३F) सुधारणा करणे व शिरुर ते छत्रपती संभाजीनगर असा ग्रीनफील्ड द्रुतगती मार्ग बांधणेबाबत वाचा येथील शासन निर्णय दि.१९.०९.२०२४ व दि.०१.१०.२०२४ अन्वये निर्णय घेण्यात आला आहे.

सदरील रस्ते हे राष्ट्रीय महामार्ग दर्जाचे असल्याने अस्तित्वातील पुणे शिरूर अहमदनगर मार्गे छत्रपती संभाजीनगर या राष्ट्रीय महामार्गाची At grade रस्त्याची (NH-७५३F) सुधारणा करण्याचे काम पूर्ण झाल्यानंतर केंद्रीय रस्ते परिवहन व राजमार्ग मंत्रालय (MoRTH) च्या सन २००८ च्या पथकर धोरणानुसार सर्व प्रकारच्या वाहनांवर पथकर आकारणेबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अस्तित्वातील पुणे शिरूर अहमदनगर मार्गे छत्रपती संभाजीनगर या राष्ट्रीय महामार्गाची At grade रस्त्याची (NH-७५३F) सुधारणा करणेबाबत मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ०१.०४.२०२५ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार खालील बाबींना मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. पुणे (सा.क्र.कि.मी.१०/६००) ते शिरुर (सा.क्र.कि.मी.६४/००) व अहमदनगर (सा.क्र. कि.मी. १२०/४००) ते देवगड (सा.क्र. कि.मी.१६२/००) या अस्तित्वातील At-grade महामार्गाचे upgradation चे काम पूर्ण झाल्यानंतर MoRTH च्या सन २००८ च्या पथकर धोरणानुसार सर्व प्रकारच्या वाहनांवर पथकर आकारणी करण्यात यावी.

२. पुणे महानगरपालिकेच्या हद्दीतील सदर रस्त्यावरील फिनिक्स मॉल ते खराडी जकात नाका सा.क्र.कि.मी.५/८०० ते १०/८०० येथील वाहतूक समस्या निवारण करणेकरीता सदर ५ कि.मी. लांबीमधील रस्त्याचे सुधारणेचे काम या प्रकल्पात समाविष्ट करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०४२५१२४४४२२५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA SUBHASH WALKE

Digitally signed by PRADNYA SUBHASH WALKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=03547a345c47dd48007cd8b37a04c70078198a1a3a877ea19b46344a4c1470d4, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D7D0C662BC335A39B2B57F9BEA7376AD5B8FA997E2E98FD45A95D4AC6B4481FC, cn=PRADNYA SUBHASH WALKE
Date: 2025.04.25 12:45:28 +05'30'

**(प्रज्ञा वाळके)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ
१४.सर्व सह सचिव/ उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
१६. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
१७.निवडनस्ती- कार्यासन (नियोजन-१अ)